# बटाटेच बटाटे

लेखिका: अनिता लोबल

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन





फार फार वर्षांपूर्वी दोन राष्ट्रे होती – एक पूर्वेला तर दुसरे पश्चिमेला. एकदा त्यांच्यात युद्ध सुरू झाले. आपली शेती, गायीगुरे, कोंबड्या यांची काळजी घेण्यास कुणाकडेही वेळ उरला नाही. युद्धादरम्यान लोक सारा वेळ केवळ तलवार परजण्यात, तोफेचे गोळे बनवण्यात आणि सैनिकांच्या गणवेशांवर बटणे शिवण्यात घालवू लागले.



या दोन देशांदरम्यान एक दरी होती. तिथे एक स्त्री राहात होती. तिला युद्धाचा तिटकारा होता. तिला दोन मुले होती. तिच्याकडे एक गाय, काही कोंबड्या आणि एक बटाट्याचे मोठे शेत होते. युद्धापासून बटाट्यांचे आणि तिच्या मुलांचे रक्षण करण्यासाठी तिने आपल्या जमिनीसभोवती एक भिंत उभारली.

मुलांचे आपल्या आईवर खूप प्रेम होते. ते आईला शेतात पेरणी करण्यात, तण उपटण्यात आणि पिकाची कापणी करण्यात मदत करत. ते गायीगुरांची काळजी घेत. त्यांना आपले उबदार घर आणि त्यातील मऊ पलंग आवडत असे.

“पण आपल्या घराभोवती या भिंतीची गरजच काय?” ते काहीवेळा आईला विचारत.

“पूर्वेकडून आणि पश्चिमेकडून येणारा वारा आपल्या बटाट्यांना लागला तर ते वाढणार नाहीत, म्हणून,” आई म्हणत असे.



एकदा कडाक्याच्या थंडीत रात्री वादळवारे वाहू लागले आणि घनघोर युद्ध सुरू झाले. दरीतील मायलेक मात्र बटाटे खाऊन शांती, समाधानाने राहात होते.



हळूहळू मुले मोठी होऊ लागली.

एकदा थोरल्या मुलाला पूर्वेकडे कवायत करत असलेली सैनिकांची पलटण दिसली.

“आई, त्यांचे लाल गणवेश आणि सुंदर तलवारी बघ,” आपल्या पाठीवरील बटाट्याची गोणी खाली टाकून तो मोठ्याने ओरडला.

“मी मळलेले, चिंध्या झालेले असे लाल गणवेश आणि वाकलेल्या, तुटलेल्या अशा तलवारी खूप पाहिल्यायत,” त्याची आई म्हणाली. “मला त्रास देऊ नकोस. कामाकडे लक्ष दे. रात्रीच्या जेवणात आपण लोण्यासोबत उकडलेले बटाटे खाऊ.”

“मला बटाटे पेरायचा वीट आलाय. मी निघून जातो,” मुलगा कंटाळून म्हणाला आणि पूर्वेकडे धावू लागला.

पुढच्या दिवशी धाकट्या मुलाने पश्चिमेकडे पाहिले. तिथे त्याला कवायत करत असलेली सैनिकांची पलटण दिसली.

“आई, त्यांचे निळे गणवेश आणि चमकदार पदकं बघ,” आपल्या हातातील फावडे खाली टाकून तो मोठ्याने ओरडला.

“मी चिंध्या झालेले, रक्ताने माखलेले असे निळे गणवेश आणि शेतात गंजत पडलेली अशी पदकं खूप पाहिलीयत. आपल्या कामाकडे लक्ष दे,” त्याची आई म्हणाली, “मी रात्री तुझ्यासाठी बटाट्याचे पराठे बनवेन.”

“मला शेतातले तण उपटायचा वीट आलाय. मी निघून जातो,” मुलगा कंटाळून म्हणाला आणि तो पश्चिमेकडे धावू लागला.

एकाकी आई धाय मोकलून रडू लागली. मग घर बंद करून ती बटाट्याच्या शेतात परतली.



दोन्ही मुले सैन्यात दाखल झाली. त्यांना नवीन गणवेश, चमकदार तलवारी आणि पदके मिळाली. कवायत करताना स्त्रिया त्यांच्यावर फुले उधळू लागल्या. कालांतराने, एक मुलगा पूर्वेकडच्या सैन्यात जनरल बनला आणि दुसरा मुलगा पश्चिमेकडच्या सैन्यात कमांडर बनला.







अनेक युद्धे झाली. पण काहीवेळा युद्धानंतर मळलेल्या गणवेशाकडे आणि वाकलेल्या तलवारीकडे बघून जनरलच्या मनात भाजलेले बटाटे आणि मऊशार पलंग यांचे विचार येत.



आणि कधीकधी रक्ताने माखलेला आपला गणवेश आणि गंजलेली पदके बघून कमांडरच्या मनात बटाट्याचे शेत आणि ऊबदार शेकोटीचे विचार येत.
दोन्ही मुले आईच्या आठवणीने दु:खी होत.





पण तरीही युद्धे होत राहीली. शेते ओसाड झाली. काही शेते जळून खाक झाली.
पूर्वेकडे आणि पश्चिमेकडे पोटाची भूक शमवायला काहीच शिल्लक राहीले नाही.



“आम्हाला भूक लागलीय,” पूर्वेकडचे सैनिक ओरडू लागले. अन्न मिळू शकेल असे एक ठिकाण त्यांच्या जनरलला माहीत होते.



“आम्हाला अन्न हवे,” पश्चिमेकडचे सैनिकही मागणी करू लागले. अन्न मिळू शकेल असे एक ठिकाण त्यांच्या कमांडरलाही माहीत होते.

मग एके रात्री दोन्ही सैन्यांनी दरीच्या दिशेने कूच केले.

दरीमध्ये एक स्त्री राहात होती. तिचे बटाट्यांचे शेत होते.



“आई, माझे सैनिक भुकेले आहेत. हे युद्ध जिंकण्यासाठी आमचं शरीर बळकट राहायला हवं,” पूर्वेकडच्या भिंतीवर उभे राहून थोरला मुलगा ओरडला.

“आई, माझ्या माणसांना अन्न हवंय. आम्हाला शेतातले बटाटे दे. मग आम्ही शत्रुंवर विजय मिळवू,” पश्चिमेकडच्या भिंतीवर उभे राहून धाकटा ओरडला.



पण भिंतीच्या पलिकडे होती फक्त नीरव शांतता!

“बटाटे, बटाटे, बटाटे, बटाटे, बटाटे!” सैनिक मोठमोठ्याने ओरडू लागले.

“चला, भिंत तोडून आत शिरू आणि बटाटे ताब्यात घेऊ!”

पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील सैन्ये भिंतीला धडकली.

बटाटे मिळवण्यासाठी दोन्ही सैन्यांमध्ये घनघोर युद्ध सुरू झाले.



थोड्याच वेळात भिंत कोसळून पडली. आतील घर नामशेष झाले.

गायीगुरे आणि कोंबड्या पळून गेल्या.

शेते पायांखाली चिरडली गेली.

कित्येक सैनिक जमिनीवर पडून कण्हू लागले.

जनरल आणि कमांडर जखमी झाले.

मग साऱ्यांना दगडमातीच्या ढिगामागे निश्चल पडून असलेली स्त्री दिसली.

आपल्या आईची, घराची आणि शेताची अवस्था बघून जनरल आणि कमांडर यांना रडू आवरले नाही.



“आई, आम्ही चुकलो,” थोरला मुलगा गहिवरला.
“हे काय करून बसलो आम्ही!” धाकटा मुलगा अश्रू ढाळू लागला.
“काहीतरी बोल आई, काहीतरी बोल,” ते कळवळून याचना करू लागले.



युद्ध थांबले. सैनिक शांतपणे उभे राहीले. त्यांनी गहिवरलेल्या जनरलला पाहीले. त्यांनी अश्रू ढाळणाऱ्या कमांडरला पाहीले. त्यांना स्वत:ची आई आठवली. मग सगळे सैनिकही रडू लागले.



पण त्यांची आई मेली नव्हती. तिने सर्वांना थोडा वेळ रडू दिले. मग तिने डोळे उघडले, ती उभी राहीली आणि म्हणाली, “तुम्ही माझं घर आणि शेत नष्ट केलंत. तरीही तळघरात तुम्हा सर्वांचं पोट भरेल इतके बटाटे आहेत. पण ते तुम्हाला देण्याआधी तुम्ही मला एक वचन दिले पाहीजे. हे युद्ध बंद करून आणि हा सारा पसारा आवरून तुम्ही आपापल्या घरी आपल्या आईकडे परतले पाहीजे.”

“आम्ही खूप भुकेलेलो आहोत. लढून लढून थकलेलो आहोत. तुम्ही म्हणाल ते आम्हाला मान्य आहे. पण आम्हाला खायला बटाटे द्या,” सैनिक गयावया करू लागले.

“आई, युद्धात तू मरू शकली असतीस,” कमांडर म्हणाला.

“तू जिवंत आहे हे पाहून खूप बरं वाटतंय,” जनरल म्हणाला.

“आम्हाला क्षमा कर,” दोघे भाऊ म्हणाले.

“बटाट्यांचा विजय असो. साऱ्या आयांचा विजय असो,” बटाटे खाऊन भूक भागल्यावर सैनिक उत्साहाने एकसुरात ओरडू लागले.

मग सैनिक बालपणी आईने शिकवलेली गाणी गाऊ लागले. त्यांच्या गाण्यांचा आवाज पूर्वेकडे आणि पश्चिमेकडे पसरला.

मुले सैन्यातून घरी परतल्यामुळे आयांचे चेहरे उजळले. सर्वत्र मायलेक गळ्यात गळे घालून आनंदाश्रू ढाळू लागले. त्यांनी दरीतील स्त्रीचे खूप आभार मानले.

घरी परतल्यावर पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील सैनिकांनी सैनिकाचे गणवेश उतरवले. त्यांनी लोकांना तलवारी आणि तोफेचे गोळे बनवायचे बंद करण्याचा सल्ला दिला.

दोन्ही मुलांनी तलवारी आणि पदके जमिनीत पुरून टाकली, शेतात बटाट्यांची पेरणी केली, घर पुन्हा उभारले आणि तुटलेल्या चीजवस्तू दुरुस्त केल्या.

पण त्यांनी घराभोवती भिंत मात्र पुन्हा बांधली नाही.

समाप्त